**सन १९८४ साली झालेल्या शिख विरोधी दंगलीतील मृत व्यक्तींच्या वारसांना यापुर्वी देण्यात आलेल्या मदतीव्यतिरिक्त केंद्रीय अर्थसहाय्य मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आरएलएफ-२०१५/प्र.क्र.३४४/म-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २७ डिसेंबर, २०१६

वाचा:-

१) केंद्र शासनाचे पत्र क्रमांकः १३०१८/४६/२००५-दिल्ली-१ (एनसी), दि.१६ जानेवारी,२००६
२) शासन निर्णय क्रमांकः सीएलएस-०३-०७/प्र.क्र.१४३/म-३, दि.०२ जुलै,२००७
३) केंद्र शासनाचे पत्र क्रमांकः १३०१८/४६/२००५-दिल्ली-१ (एनसी),दि.१६डिसेंबर,२०१४
४) शासन निर्णय क्रमांकः आरएलएफ-२०१५/प्र.क्र.३२४/म-३, दि.३१ मार्च,२०१६

**प्रस्तावना :**

सन १९८४ साली झालेल्या शिख विरोधी दंगलीतील बाधीत व्यक्तींना मदत देण्यासंदर्भात स्थापित केलेल्या न्या.नानावटी आयोगाच्या शिफारशीची अंमलबजावणी करण्यासाठी केंद्र शासनाने दिनांक १६ जानेवारी, २००६ रोजी “विशेष पॅकेज” जाहिर केले. सदर पॅकेजमधील मार्गदर्शक तत्वानुसार मृत व्यक्तींच्या वारसांना प्रत्येकी रु.३.५० लक्ष इतकी मदत देण्यात आली आहे.

केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दि.१६ डिसेंबर,२०१४ रोजीच्या पत्रान्वये देण्यात आलेल्या निर्देशानुसार सन १९८४ साली झालेल्या शिख विरोधी दंगलीतील मृत व्यक्तींच्या वारसांना यापुर्वी देण्यात आलेल्या मदती व्यतिरिक्त प्रत्येकी रु.५.०० लक्ष (रुपये पाच लक्ष फक्त) इतकी मदत राज्य शासनाने प्रथम खर्च करुन त्याची प्रतिपूर्तता केंद्र शासनाकडून करण्याचे प्रस्तावित आहे. केंद्रिय योजनेनुसार राज्यात शिख दंगलीतील ९ मृत व्यक्तींच्या वारसास मदत देण्यासाठी प्रत्येकी रु.५.०० लक्ष याप्रमाणे एकूण रुपये ४५.०० लक्ष इतक्या निधीची मागणी करण्यात आली होती. त्यापैकी रु.४०.०० लक्ष इतका निधी संदर्भाधीन क्र.४ येथील दि.३१ मार्च,२०१६ येथील शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आला आहे. त्याव्यतिरिक्त कै.श्री.उत्तम गायकवाड, जिल्हा सोलापूर यांच्या वारसांना त्यास अनुसरुन सदर निधी उपरोक्त प्रयोजनार्थ उपलब्ध करुन देण्याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

**शासन निर्णय** :-

सन १९८४ साली झालेल्या शिख विरोधी दंगलीतील कै.श्री.उत्तम गायकवाड, जिल्हा सोलापूर या मृत व्यक्तींच्या वारसांना यापूर्वी देण्यात आलेल्या मदतीव्यतिरिक्त केंद्र शासनाच्या निर्देशानुसार रु.५.०० लक्ष इतकी मदत देण्यासाठी जिल्हाधिकारी, सोलापूर यांना रु.५.०० लक्ष (रुपये पाच लक्ष फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्यास या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

२. जिल्हाधिकारी, सोलापूर यांना रु.५.०० लक्ष (रुपये पाच लक्ष फक्त) इतका निधी सन २०१६-१७ या वित्तीय वर्षामध्ये अर्थसंकल्पीय तरतुदीन्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीमधून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

मागणी क्रमांक सी-५<br>
२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण,<br>
६०, इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम,<br>
२०० इतर कार्यक्रम,<br>
(०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य,<br>
(०१)(०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य,<br>
(२२३५०३४७),<br>
३१,सहायक अनुदाने (वेतनेतर)(दत्तमत)

३. सदर निधी अर्थसंकल्प वितरण प्रणाली (बीडीएस) वर जिल्हाधिकारी, सोलापूर यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. सदर निधीचे वितरण केंद्र शासनाच्या सूचनांनुसार संबंधीत मृत व्यक्तींच्या वारसांना करण्यात यावा. वरील मृत व्यक्तीचे वारसांमध्ये काही बदल आढळून आल्यास त्याची खातरजमा जिल्हाधिकारी यांनी करावी. संबंधीत योग्य वारसास तातडीने रक्कम अदा करण्याची कार्यवाही करुन केलेल्या कार्यवाहीचा अहवाल प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन) यांच्याकडे सादर करावा.

४. केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दिनांक १६ डिसेंबर,२०१४ रोजीच्या पत्रामध्ये देण्यात आलेल्या सूचनेनुसार मृत व्यक्तीच्या वारसास मदत देण्याची कार्यवाही तात्काळ करण्यात यावी.तसेच केंद्र शासनाकडून सदर रक्कमेची प्रतिपूर्ती करण्याबाबत उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे. तसेच पुढीलप्रमाणे वाटपाबाबतची माहिती कळविण्यात यावी.:-

| No. | Name of deceased | Details (Name & address of NOK) | Sanction Order No. & Date | Amount disbursed | Details of disbursement (Cheque No. & Date) |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |

५. सदर निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेखे/नोंदवह्या विहित कार्यपध्दतीनुसार आहरीत व वितरीत करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्याच्या सूचना देण्यात याव्यात. वर्ष अखेरीस संपूर्णपणे प्रमाणित विनियोजन लेखे या विभागाकडे सादर करण्याची दक्षताही नियंत्रक अधिकाऱ्यांनी घ्यावी.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.९८/२०१६/व्यय-०९, दिनांक २९ मार्च, २०१६ अन्वये दिलेल्यास सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२८१११४४६०२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dinesh Rohidas Chavan

Digitally signed by Dinesh Rohidas Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6d826b10ad447a82c4c6b08bdc2d2b99f22e6cf7231a8d19a6130cb67fc0742e, cn=Dinesh Rohidas Chavan
Date: 2016.12.28 11:17:45 +05'30'

**( दिनेश चव्हाण )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
२. जिल्हाधिकारी, सोलापूर.
३. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर.
४. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६. वित्त विभाग (अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-४/अर्थसंकल्प-६/व्यय-०९), मंत्रालय, मुंबई.
७. अवर सचिव/कक्ष अधिकारी (कार्यासन ब-१) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (कार्यासन म-०३), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत माहितीसाठी :-**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
२. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
३. प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.